विभागीय पदोन्नती समितीचे गठन करण्याबाबत..



**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्र. पदोन्न-२०२३/प्र.क्र.८७/२३/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०४ ऑगस्ट, २०२३.

<u>संदर्भ</u>- सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/ कार्यासन १२, दिनांक ०१.०८.२०१९

**<u>शासन आदेश</u> :**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्य शासकीय अधिकारी व कर्मचारी यांना पदोन्नती देण्याकरीता अनुसरावयाच्या कार्यपध्दतीची एकत्रित मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. सदर शासन निर्णयातील परिच्छेद अ (ii) येथे ६ व्या वेतन आयोगानुसार ज्या पदांचे ग्रेड वेतन रु. ७५९९/- किंवा त्यापेक्षा कमी आहे अशा सर्व "गट-अ" मधील पदांसाठी पदोन्नतीबाबत/ पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्यासाठी नियुक्ती प्राधिकाऱ्यास शिफारस करण्याकरीता विभागीय पदोन्नती समितीचे गठन करण्याची तरतूद करण्यात आली आहे.

२. त्यास अनुसरून तंत्रशिक्षण संचालनालय यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये/संस्था या मधील ६ व्या वेतन आयोगानुसार ज्या पदांचे ग्रेड वेतन रु.७५९९/- किंवा त्यापेक्षा कमी आहे अशा (आस्थापना मंडळाच्या कक्षेबाहेरील) गट-अ संवर्गातील पदांसाठी पदोन्नती/पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्याबाबत नियुक्ती प्राधिकाऱ्यास शिफारस करण्याकरीता खालील प्रमाणे विभागीय पदोन्नती समितीचे गठन करण्यात येत आहे-

| अ.क्र. | तपशिल | पदनाम |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २. | संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ३. | उप सचिव, महाविद्यालयीन शिक्षण, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४. | उप सचिव, तंत्र शिक्षण, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०४१६४७१२५३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PAGARE SHRIKRISHNA KASHINATH

Digitally signed by PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=cc78d6dbb4fe0c3d5473ed374dc1007ae7db08a8a6ca9468ce2a8aae16c0cb06, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4E8BC157609C105D396B04018FA47F8909333AFC18DDC3893CC043F18F759C0B, cn=PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
Date: 2023.08.04 16:48:25 +05'30'

**( श्रीकृष्ण पगारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. उप सचिव, महाविद्यालयीन शिक्षण, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव, तंत्रशिक्षण, यांचे स्वीय सहायक, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. निवड नस्ती, तांशि-१.